# महाराष्ट्र शासन

कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग,
शासन निर्णय क्रमांक : मत्स्यवि-२०१०/प्र. क्र.२४७/पदुम-१४
मंत्रालय विस्तार, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : २८ सप्टेंबर, २०१०

**प्रस्तावना :-** मासेमारी व्यवसायामध्ये मच्छिमारांना विविध साधनसामुग्रीचा उपयोग करावा लागतो. यामध्ये प्रामुख्याने जाळी, होडया, बिगर यांत्रिक नौका इ. चा समावेश आहे. भूजल क्षेत्रातील जाळी व होडया वेगवेगळ्या पध्दतीच्या असून सागरी क्षेत्रात मात्र बिगर यांत्रिकी नौका व भिन्न प्रकारची जाळी वापरली जातात. त्यामुळे मासेमारी साधनांवर अर्थसहाय्य देताना भूजल व सागरी क्षेत्राचा वेगवेगळा विचार करण्यात आला आहे. तसेच याबाबतच्या मार्गदर्शक सूचना निर्गमित करण्याबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

## शासन निर्णय :-

### १) सूत व तयार जाळयावरील अनुदान:-

भूजल क्षेत्रातील वापरली जाणारी जाळी ही प्रामुख्याने नायलॉन सूतापासून तयार केली जातात. सद्यस्थितीत फार कमी प्रमाणात नायलॉन सूत किंवा जाळी तयार केली जातात. प्रामुख्याने तयार जाळयांचा उपयोग मासेमारीकरिता केला जातो. भूजल क्षेत्रातील मच्छिमारांना त्यांनी विकत घेतलेल्या सूतावर किंवा तयार जाळयांच्या ५०% कि मतीच्या परंतु ५ किलो सुताच्या किंमतीच्या ५०% पेक्षा जास्त नाही इतके अनुदान अनुज्ञेय राहील. सदर अनुदान प्रत्येक मच्छिमाराला प्रतिवर्षी ५ किलो पर्यंतच्या मर्यादेत देय राहील.

सागरी क्षेत्रातील मासेमारी नौकांवर वापरण्यात येणाऱ्या जाळयांवर खालीलप्रमाणे अनुदान अनुज्ञेय राहील-

| | |
|---|---|
| ३ मे.टनावरील प्रत्येक नौकेस प्रत्येक वर्षी ( १०० कि.ग्रॅ.पर्यंत) | जाळयाच्या किंमतीच्या १५% परंतु तेवढ्याच वजनाच्या सुताच्या किंमतीच्या १५% पेक्षा जास्त नाही इतके अनुदान देय राहील. |
| ३ मे. टनाखालील प्रत्येक नौकेस प्रत्येक वर्षी ( ५० कि.ग्रॅ.पर्यंत) | |

रांपणकाराना रांपणीच्या सूत / जाळयांवर अनुदान :-

| | |
|---|---|
| नायलॉन सूत जाळी यांच्या किंमतीच्या १५ % | हे अनुदान रांपण संघाच्या प्रत्येक सभासदाला प्रतिवर्षी ३० किलोप्रमाणे मर्यादेत राहील. |
| मोनोफिलामेंट सिंथेटिक सूत/जाळी किंवा फिलामेंट किंमतीच्या १५% | |

### २) बिगर यांत्रिक नौका:-

भूजल क्षेत्रात लहान आकाराच्या होडया वापरल्या जातात. या होडया/नौका बांधणीसाठी ५०% पर्यंत रु.३,००० इतक्या कमाल मर्यादेपर्यंत अनुदान अनुज्ञेय राहील.

सागरी क्षेत्रातील परंपरागत पध्दतीने मासेमारी करणाऱ्या व आर्थिकदृष्टया दुर्बल घटकातील लहान मच्छिमारांना तसेच रांपणकारांना मासेमारीकरिता सहाय्य व्हावे यादृष्टिने १० टनापर्यंतच्या बिगर यांत्रिक नौका बांधण्यास किंवा तयार नौका खरेदी करण्याकरिता प्रकल्प किंमतीच्या ५०% किंवा रु.६०,००० यापैकी जे कमी असेल तेवढे अनुदान अनुज्ञेय राहील.

या योजनेच्या मार्गदर्शक सूचना परिशिष्ट-अ व ब मध्ये देण्यात येत आहेत.

मच्छिमार सहकारी संस्थांना मासेमारी साधनांवर अर्थसहाय्य या जिल्हास्तरीय योजनेंतर्गत प्राप्त होणाऱ्या तरतुदींच्या लेखाशिर्षाखाली जिल्हास्तरीय योजनांकरीता ज्या जिल्ह्यात तरतुदीमधून अर्थसंकल्पित करण्यात येतील, त्यामधून करण्यात यावा व तो २४०५ मत्स्यव्यवसाय ह्या मुख्यलेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

हा शासन निर्णय नियोजन विभागाच्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे. तसेच सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या संकेतस्थळावरुन प्रसारित करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०१००९२८१५२७४६००१ असा आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने**

**सही/-**
**(शु.अ.गद्रे)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

**आयुक्त, मत्स्यव्यवसाय, महाराष्ट्र राज्य, मुंबई ( ५ प्रती )**
**महालेखापाल, महाराष्ट्र-१/२ (लेखा परिक्षा व लेखा अनुज्ञेयता), मुंबई/नागपूर.**
**अवर सचिव पदुम १६, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय.**
**सर्व प्रादेशिक उपायुक्त मत्स्यव्यवसाय,**
**सर्व जिल्हयांचे सहायक आयुक्त मत्स्यव्यवसाय,**
**सर्व जिल्हा कोषागार अधिकारी / निवड नस्ती.**

## परिशिष्ट - अ

## <u>मच्छिमारांच्या साधनांवर अर्थसहाय्य.</u>

१) लाभार्थी हा मत्स्यव्यवसाय सहकारी संस्थेचा सभासद असावा.

२) लाभार्थी हा क्रियाशिल मच्छिमार असावा.

३) मच्छिमार साधने सभासदांना खरेदी करण्यापुर्वी संस्थेमार्फत विभागाकडे मागणी नोंदविणे आवश्यक राहील.

४) मत्स्यव्यवसाय सहकारी संस्थाना त्यांच्या सभासदांकरिता अनुदान देय असलेले सुत किंवा तयार जाळे कोणत्याही विक्रेत्याकडून खरेदी करण्याची मुभा राहिल.परंतु खरेदी केलेले सुत/जाळी यांचा विहित पंचनामा संबंधित सहाय्यक मत्स्यव्यवसाय विकास अधिकारी यांनी केल्यानंतर व तो पंचनामा सहाय्यक आयुक्त यांनी ग्राहय धरल्यानंतर अनुदान अनुज्ञेय राहील. पंचनाम्याचा नमुना सोबत जोडला आहे.

५) तयार जाळी प्राथमिक मच्छिमार सहकारी संस्थानी परस्पर खरेदी करुन ती मच्छिमार सभासदांना अनुदानित दराने पुरविण्याची सवलत देण्यात येत आहे.

६)केवळ महाराष्ट्र राज्यात राहणाऱ्या व मत्स्यव्यवसाय करणाऱ्या मच्छिमारास संबधित मच्छिमार सहकारी संस्थेच्या शिफारशी नुसार अनुदान अनुज्ञेय राहिल.

७)रांपणसंघानी आपल्या संघाचे नांव त्या संघातील सदस्यांची नांवे व त्यांचे संपूर्ण पत्ते दरवर्षी एप्रिल महिन्यात त्यांचे जिल्हयातील सहकारी मच्छिमारी संस्थांना कळवावीत. मत्स्यव्यवसाय विभागाच्या जिल्हा कार्यालयात नोंद झालेल्या संघाना/संस्थांना या योजनेचा फायदा मिळेल. संघातील/संस्थेतील सदस्यांच्या नावात / संख्येत बदल झाल्यास तो बदल झाल्यापासून एक महिन्यात जिल्हा कार्यालयाला कळवावा. मात्र कोणत्याही परिस्थितीत त्या वर्षाच्या सुरवातीस कळविलेल्या सभासद संख्येच्या मर्यादेपर्यंतच त्यावर्षी अनुदान देण्यात येईल. रांपण संघ/संस्थातील सभासद संख्या, त्यात झालेला बदल याबाबत उपरोक्त अर्थसहाय्याबाबतचा निर्णय सहाय्यक आयुक्त मत्स्यव्यवसाय देतील.

८)सूत/जाळी खरेदी स्थानिक मासेमार सहकारी संस्था अथवा जिल्हा मच्छिमार सहकारी संघाकडून करावी. सदरहू संस्थांना रांपणकारांना हवे असेलेले सूत/जाळया पुरविण्यासाठी अडचणी असल्यास रांपण संघाने तालुका अगर जिल्हयाच्या ठिकाणी सूत/जाळी विक्रीचा व्यवसाय करणाऱ्या विक्रेत्याकडून सूत खरेदी केली तरी चालेल. सदर सूत/जाळी खरेदीच्या पावत्या संबंधीत रांपण संघाच्या शिफारशीसह मत्स्यव्यवसाय कार्यालयाकडे अनुदान मंजूरीसाठी सादर कराव्यात.

९)सूत/जाळी खरेदीच्या पावत्या खरेदीच्या दिनांकापासून तीन महिन्यांच्या आंत जिल्हा कार्यालयास सादर कराव्यात. एका संघास/संस्थेस एका आर्थिक वर्षात जास्तीत जास्त तीन वेळा अनुदानासाठी प्रस्ताव पाठविता येतील.

१०)अनुदानाची मंजूर रक्कम जिल्हा कार्यालयाकडून संघ/संस्थाच्या नांवे बँक ड्राफ्टने अदा करण्यात येईल व त्याची पोंच पावती संघाने/संस्थानी द्यावी तसेच संघाचे/संस्थांचे सदस्यांना अनुदानाची रक्कम पोचल्याच्या त्यांचेकडून घेतलेल्या पावत्या जिल्हा कार्यालयास अनुदानाची रक्कम मिळाल्यापासून एक महिन्याच्या आंत पाठवाव्यात. तसे न केल्यास सदरहू संघाने/संस्थेने अनुदानासाठी पाठविलेले नवीन प्रस्ताव विचारात घेण्यात येणार नाहीत व त्याची जबाबदारी संघावर/संस्थेवर राहील.

११)ज्या सदस्यांची विभागाकडून घेतलेल्या कर्ज रकमेच्या देय हप्त्यांची रक्कम येणे असेल ती त्यांना मंजूर करण्यात आलेल्या अनुदानातून वळती करण्यात येईल.

१२)एका व्यक्तिस संबंधित अनुदानाचा लाभ वर्षातून एकदाच घेता येईल. तो एकाच संघातून/संस्थेतून मिळेल. सर्व सदस्यांना लाभ मिळेल व एकच व्यक्ति एकाहून अधिक संघातून/संस्थेतून लाभ घेणार नाही हे पहावयाची जबाबदारी संबंधित रांपण संघाची/संस्थाची राहील.

**परिशिष्ट - ब**

**बिगर यांत्रिक नौकांसाठी लहान मासेमारांना अर्थसहाय्य**

**अर्थसहाय्य मिळयासाठी आवश्यक बाबी :-**

१) अर्जदाराचे वार्षिक उत्पन्न एकात्मिक ग्रामिण विकास योजनेमार्फत अनुदान मिळण्यास पात्र उत्पन्न मयादेपर्यंत असावे.

२) अर्जदारांनी पूर्वी यंत्रिक किंवा बिगर यांत्रिक नौकांसाठी अनुदानाचा लाभ घेतलेला नसावा, असल्यास त्याच्या हिश्श्याची अनुदानाची रक्कम परत करावी.

३) तसेच अर्जदाराने मत्स्यव्यवसाय विभागाकडून घेतलेले सर्व कर्ज व्याजासह चुकते केलेले असावे.

**अर्थसहाय्य मिळविण्याची पद्धती :-**

अर्जदाराने आपल्या अर्जाच्या प्रती संबंधित मच्छिमार सहकारी संस्थांना शिफारशीसह सहाय्यक आयुक्त, मत्स्यव्यवसाय यांचेकडे सादर कराव्यात. सदर अर्जासोबत खालील कागदपत्रे पाठवावीत. अर्जात नौका व अन्य साधनांसाठी किती रक्कम लागणार आहे व कर्ज कोणत्या बँकेकडून घेणार, याचा तपशिल द्यावा. तसेच-

अ) संबधित तालुक्यातील तहसिलदार अथवा गट विकास अधिकारी योचकडून अर्जदाराच्या एकूण वार्षिक उत्पन्नाचा दाखला दर्शविणारे प्रमाणपत्र

ब) संस्थेचा सभासद व मच्छिमार असल्यासंबंधीचा संस्थेचा दाखला

क) नौका बांधणीचा करारनामा

ड) शीड, वल्ही, नांगर, दोर यांच्या निविदा

अर्जदारांच्या अर्जाची संबधित सहाय्यक आयुक्त, मत्स्यव्यवसाय आवक दिनांकानुसार नोद घेतील. जिल्हा कार्यालय अधिकारी उपलब्ध निधी, अर्जाचा प्राथम्य क्रम, तसेच तो थकबाकीदार नाही, अ. गोष्टी लक्षात घेवून अर्जदाराने नमूद केलेल्या बँकेकडे कर्जाची शिफारस करतील. अशी शिफारस करतानां संबंधित कार्यालय विभागातर्फे अर्जदारास किती अनुदान देण्यात येईल एवढेच नमूद करील व तसे अर्जदारास कळवील. बँकेकडून कर्ज मिळविण्याची जबाबदारी अर्जदाराची राहील.

**अटी :-**

१) अनुदान प्राप्त बिगर यांत्रिक नौका अनुदान दिल्यापासून ७ वर्षाच्या कालावधीत हस्तांतरीत अथवा विकता येणर नाहीत

२) अशा नौकांवर ७ वर्ष होईपर्यंत इंजिन बसविता येणार नाही

३) इंजिन बसविणे आवश्यक असल्यास विभागाची पूर्वपरवानगी घ्यावी लागेल. अशा इंजिनावर अनुदान मिळणार नाही या अटी मान्य असल्यास अर्जदारानी अनुदान घेण्यापूर्वी करारनामा स्टँम्प पेपरवर करुन द्यावा

४) सागरी क्षेत्रातील बिगर यांत्रिक नौका विहित पद्धतीनुसार संबंधित यंत्रणेकडे नोंदणी करतील व मासेमारी परवाना घेतील. त्यानंतर सदरहू नौका मालकास अनुदान अदा करण्यात येईल

५) भूजल क्षेत्रातील लहान होड्यांची संबंधित जिल्हा कार्यालयातर्फे नोंदणी करण्यात येईल व तसे अभिलेख हे कार्यालय ठेवतील

६) नोंदणी क्रमांक सदरहू नौकेवर लिहिल्यानंतर अनुदान अनुज्ञेय राहील.

## मत्स्यव्यवसाय विभाग

## सूत व तयार जाळे यावर अनुदान मंजूर करण्याकरीता पंचनामा

१) पंचनामा करणाऱ्या अधिकाऱ्यांचे नाव व पदनाम
२) पंचनामा दिनांक
३) मत्स्यव्यवसाय सहकारी संस्थेचे नाव
४) सूत/जाळे वाटप करावयाच्या सभासदांची यादी
५) नायलॉन सूत/जाळे खरेदी केलेल्या विक्रेत्याचे नाव व पत्ता
६) खरेदी केलेले एकूा सूत/तयार जाळे
७) सूत/तयार जाळे निव्वळ किंमत
८) संस्थेकडे ठेक्याने असलेले तलाव व जलक्षेत्र
९) पंचनाम्यानुसार अनुज्ञेय अनुदान
१०) संबंधित अधिकाऱ्याचे अभिप्राय

पंचनामा करणाऱ्याची स्वाक्षरी

१) अध्यक्ष, मत्स्यव्यवसाय सहकारी संस्था/संघ
२) संस्थेचे इतर सभास किंवा पदाधिकारी
३) गावचे सरपंच किवा उपसरपंच किंवा ग्रामसेवक
४) ग्रामसभेतील एक सदस्य
५) संस्थेचा सचिव व मॅनेजर
६) संबंधित सहाय्यक मत्स्यव्यवसाय विकास अधिकारी यांची स्वाक्षरी
७) संबंधित सहाय्यक आयुक्त, मत्स्यव्यवसाय यांची स्वाक्षरी